(वितरण आदेश क्रमांक-४)

सन २०१७-२०१८ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (NRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०१७/प्र.क्र. १२९/योजना-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०१७

**वाचा** :- १ केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.जे१२०२५/०१/२०१७-आरएल (एनआरएलएम __१२बी), दिनांक २५ एप्रिल, २०१७ चे वितरण आदेश.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, (NRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य या योजनेकरिता पहिला हप्ता म्हणून रु.२३०५.९२ लाख इतका निधी वितरीत केलेला आहे. राज्याच्या एकत्रित निधीमध्ये सदर निधी जमा झालेला आहे. त्यामुळे सदर केंद्र निधी रु.२३०५.९२ लाख, समरुप राज्य हिस्सा रु.१५३७.२८ लाख असे एकूण रु. ३८४३.२० लाख वितरित करणे आवश्यक आहे परंतू सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (NRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य केंद्र हिश्याकरिता रु.२२६२.०० लक्ष व समरुप राज्य हिस्सा रु.१५०८.०० लक्ष असे एकूण रु.३७७०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत केलेला असल्यामुळे एकूण रु.३७७०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१७-१८ मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (NRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य या योजनेचा केंद्र हिस्सा (२५०१ २८६४) व समरुप राज्य हिस्सा (२५०१ २८१९) याकरिता केलेल्या तरतूदीतून एकूण रु.३७७०.०० लाख (रु.सदतीस कोटी सत्तर लाख फक्त) इतका निधी दिनांक ३१ जुलै, २०१७ रोजी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात आला आहे.

२. सदर रक्कम अतिरिक्त संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.२२६२.०० लाखाचा खर्च "मागणी क्र.एल - ३, २५०१ ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) (०९) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य (SCSP) (केंद्र हिस्सा ६०%), ३३ अर्थसहाय्य (२५०१ २८६४)" या लेखाशिर्षाखाली व रु.१५०८.०० लाखाचा खर्च "मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) (०६) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला विशेष घटक योनजेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य, (SCSP) (राज्य हिस्सा ४०%), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ २८१९)" या लेखाशिर्षाखाली केलेल्या सन २०१७-२०१८ मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, यांचे कडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक २० एप्रिल, २०१६ व दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३११/२०१७/व्यय-१५, दिनांक १९ जून, २०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१४१६२०४५२६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2017.08.14 16:10:22 +05'30'

**(अनिल काळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतींसह)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
३) अतिरिक्त संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
५) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६) कक्ष अधिकारी (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
८) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-२ व योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९) निवडनस्ती.